<u>सामान्य राज्य सेवा गट-अ</u>

अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील उपसंचालक या संवर्गातील पदावर नामनिर्देशनाद्वारे नियुक्ती

# महाराष्ट्र शासन

## नियोजन विभाग

## शासन आदेश क्रमांकः नामनि २०१४/प्र.क्र.११२/का-१४२७

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: २७ नोव्हेंबर,२०१४

<u>वाचा :-</u>

१) महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे पत्र क्रमांक ८७८/७९९/आठ, दिनांक ३० जुलै, २०१४.

## <u>शासन आदेश</u>

अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील उपसंचालक, सामान्य राज्य सेवा, गट-अ या संवर्गातील पदावर नामनिर्देशनाद्वारे नियुक्तीसाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधीन पत्रान्वये उमेदवारांची त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या प्रवर्गातून शिफारस केली आहे. त्यानुसार उपसंचालक या पदावर उमेदवार रुजू होतील त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी त्यांची उपसंचालक, सामान्य राज्य सेवा, गट-अ या पदावर वेतन बँड रुपये १५६००-३९१०० + ग्रेड वेतन रुपये ५,४००/- या वेतन संरचनेत स्तंभ-६ मध्ये दर्शविलेल्या पदावर स्तंभ-५ मधील नमूद विभागीय संवर्गात नियुक्ती करण्यात येत आहे. उपसंचालक,सामान्य राज्य सेवा,गट-अ या पदाचे वेतन संरचनेत प्रारंभिक वेतन रुपये १५६००/- + ग्रेड वेतन रुपये ५,४००/- मिळून रुपये २१,०००/- इतके राहील.

| अ.क्र. | उमेदवारांचे नांव व जातीचा प्रवर्ग व पत्ता | नियुक्तीचा प्रवर्ग | बंधपत्रानुसार मागितलेला विभागीय संवर्ग | सामान्य प्रशासन विभागाने वाटप केलेला विभागीय संवर्ग | पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १. | श्री. अनिल दशरथराव गोतमारे,<br>४७, जनहित सोसायटी, झाडे ले आऊट, जयताळा रोड, नागपूर ४४० ०१६. | इ.मा.व. | नागपूर | नागपूर | उपसंचालक, विभागीय आयुक्त कार्यालय (नक्षलग्रस्त भाग विशेष कृती आराखडा), नागपूर |
| २. | श्री. संजय श्रीधर मरकळे, | अराखीव | पुणे | पुणे | उपसंचालक, अर्थ व सांख्यिकी |

| अ.क्र. | उमेदवारांचे नांव व जातीचा प्रवर्ग व पत्ता | नियुक्तीचा प्रवर्ग | बंधपत्रानुसार मागितलेला विभागीय संवर्ग | सामान्य प्रशासन विभागाने वाटप केलेला विभागीय संवर्ग | पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| | फ्लॅट नं. बी-५०३, श्रीलक्ष्मीधाम सहकारी गृहरचना संस्था मर्या., स.नं.४६३, सुतारवाडी, पाषाण, पुणे ४११०२१ | | | | संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, पुणे |
| ३. | श्री. योगेंद्र अशोक चौधरी, बी-३/४, संगम सोसायटी, दिनानाथ वाडी, रिंग रोड, जळगांव ४२५ ००१ | इ.मा.व. | नाशिक | कोकण | उपसंचालक (मूल्यमापन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुख्य कार्यालय, मुंबई |
| ४. | श्री.रविंद्र पुंडलिकराव काळे मातृधन, ५५, नंदनवन कॉलनी, दातेराव ले आऊट, मनोर मांगल्याचे मागे, जुना बायपास मार्ग, अमरावती ४४४ ६०७ | अराखीव | अमरावती | अमरावती | जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, अमरावती |
| ५. | श्री.सुशील हेमचंद्र आग्रेकर क्रांती कॉलनी, अकोली रोड, सातुर्णामागे, टेलिकॉम कॉलनीजवळ, अमरावती ०७ | अराखीव | अमरावती | कोकण | वरिष्ठ संशोधन अधिकारी, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुख्य कार्यालय, मुंबई |
| ६. | श्री. संजय वसंत काळे ब-२७१/३, शासकीय वसाहत, बांद्रे (पूर्व), मुंबई ४०००५१ | भ.ज.(क) | कोकण | कोकण | जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, पालघर |

२. ही नियुक्ती खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून करण्यात येत आहे:-

अ) महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियम) नियमावली, १९८२ व त्यामध्ये वेळोवेळी करण्यांत येणा-या सुधारणांच्या अधीनतेने त्यांची ज्येष्ठता राहील.

आ) त्यांनी यापूर्वी हिंदी व मराठी भाषा परिक्षा उत्तीर्ण केलेली नसेल किंवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून त्यांना सूट मिळाली नसेल तर त्यांनी यासंबंधी शासनाच्या प्रचलित नियमानुसार भाषा परिक्षा त्यांना विहीत मुदतीत उत्तीर्ण करणे आवश्यक आहे.

इ) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक १९/०३/२००३ व शासन निर्णय, माहिती तंत्रज्ञान (सा.प्र.वि.), क्रमांक मातंस २०१२/प्र.क्र.२७७/३९, दिनांक ४ फेब्रुवारी, २०१३ नुसार त्यांनी त्यांच्या नियुक्तीपासून दोन वर्षात संगणक हाताळणीसंबंधी शासनाने विहित केलेली परिक्षा उत्तीर्ण केल्यासंबंधीचे प्रमाणपत्र सादर करावे. अन्यथा हा कालावधी संपताच त्यांची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल व याबाबत त्यांचे कोणतेही निवेदन विचारात घेतले जाणार नाही, अथवा, परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून कोणालाही सूट दिली जाणार नाही, अथवा, परीक्षा उत्तीर्ण होण्यास मुदतवाढही दिली जाणार नाही.

ई) जर ते शासन सेवेत रुजू झाल्यानंतर सेवेचा राजीनामा देऊ इच्छित असल्यास, त्यांना शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही १०९२/१०३३/प्र.क्र.३३/९२/९२/८, दिनांक २/१२/१९९७ मधील तरतूदीनुसार शासनाला किमान १ (एक) महिन्याचे वेतन देणे आवश्यक राहील. मात्र, गैरशिस्त, सेवानियमांचा भंग इत्यादी कारणांसाठी एखाद्या उमेदवाराची सेवा समाप्त करण्यासाठी वरीलप्रमाणे नोटीस देण्याचे बंधन शासनावर राहणार नाही.

उ) जर परिविक्षाधीन अधिका-याने कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास आणि/किंवा विहित विभागीय परीक्षा, अन्य काही परीक्षा असल्यास, परिविक्षा कालावधीमध्ये परीक्षा उत्तीर्ण न केल्यास आणि अशा त-हेने त्यांचे काम किंवा वर्तणूक अयोग्य अथवा अननुरुप आढळल्यास तो सेवेतून कमी करण्यास पात्र ठरेल.

ऊ) त्यांना एक पत्नी/पती हयात असताना दुसरा विवाह करता येणार नाही. तसेच त्यांनी शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : एसआरव्ही २०००/प्र.क्र.१७/२०००/१२, दिनांक १ जुलै, २००५ नुसार लहान कुटुंबाचे प्रमाणपत्र सादर करावे.

ऋ) सदर उमेदवारांची नियुक्ती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असून त्यांच्या चारित्र्य व पूर्व चारित्र्य पडताळणीचा अहवाल असमाधानकारक असल्याचे निदर्शनास आल्यास त्यांची नियुक्ती कोणतेही कारण न देता १ महिन्याची नोटीस देवून समाप्त करण्यात येईल.

ऌ) वरील नियुक्ती दिलेल्या उमेदवारांपैकी जे उमेदवार अगोदरच शासन सेवेत कार्यरत आहेत. त्यांची सध्याची वर्तणुक अशोभनीय असल्याचे भविष्य काळात निदर्शनास आल्यास, त्यांची नियुक्ती कोणतीही पूर्व सूचना न देता समाप्त करण्यात येईल.

३. सदर उमेदवारांनी त्यांच्या पदस्थापनेच्या पदावर सदर आदेश निर्गमित केल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आंत रुजू व्हावे. ते विहीत कालमर्यादेत रुजू न झाल्यास त्यांना नियुक्ती स्विकारावयाची नाही, असे गृहित धरुन त्यांच्या नियुक्तीचे आदेश रद्द केले जातील.

४ सदर उमेदवारांनी नियुक्तीनंतरच्या पदस्थापनेच्या पदावर रुजू होतेवेळी त्यांनी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे अर्जासोबत जोडलेल्या सर्व प्रमाणपत्रांच्या मूळ प्रती (जन्म तारीख, वय, शैक्षणिक अर्हता, अनुभवाचे प्रमाणपत्र, मागासवर्गीय जातीचे प्रमाणपत्र, जात वैधता प्रमाणपत्र, महाराष्ट्र राज्याचे अधिवास प्रमाणपत्र इ.) तपासणीसाठी संबंधित कार्यालय प्रमुखाकडे सादर करावीत. त्या प्रमाणपत्राच्या वैधतेवर त्यांना रुजू करुन घेण्यात येईल.

५. उपरोक्त उमेदवार हे जर राज्य शासनाच्या अन्य विभाग/कार्यालयात काम करीत असतील तर संबंधित नियंत्रक अधिका-यांनी त्यांना नेमणूकीचे ठिकाणी हजर होण्याच्यादृष्टीने पुरेसे अगोदर कार्यमुक्त करावे. तसेच नियुक्तीधारक उमेदवार इतरत्र कार्यरत असल्यास सदर सेवेतून त्यांना विहित पध्दतीने कार्यमुक्त केल्याचे प्रमाणपत्र सादर करावे किंवा इतर कोणत्याही सेवेत कार्यरत नसल्याबाबतचे घोषणापत्र त्यांना भरुन द्यावे लागेल. अर्जात नमूद केलेल्या माहितीनुसार सर्व अनुभव प्राप्त उमेदवारांनी त्यांना पूर्वीच्या कार्यालयाने कार्यमुक्त केल्याचे आदेश/प्रमाणपत्र अथवा शासकीय/निमशासकीय/ खाजगी सेवेत कार्यरत नसल्याबाबतचे घोषणापत्र संबंधीत पदस्थापना दिलेल्या कार्यालयात सादर केल्याशिवाय त्यांना रुजू करुन घेता येणार नाही.

६. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक अंनियो-१००५/१२६/सेवा-४, दिनांक ३१ ऑक्टोबर, २००५ नुसार, दिनांक १ नोव्हेंबर, २००५ किंवा त्यानंतर नियुक्ती होणा-या अधिकारी/कर्मचारी यासाठी नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू केली आहे. यास्तव जे उमेदवार शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक अंनियो १००६/८७/सेवा-४, दिनांक १२ जानेवारी, २००७ मधील अटींची पुर्तता करीत असतील व त्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरत असेल असे उमेदवार वगळता इतर सर्व उमेदवारांना उक्त दिनांक ३१/१०/२००५ च्या शासन निर्णयानुसार नवीन परिभाषित अंशदान योजना लागू ठरेल.

७. संबंधित उमेदवारांनी पदभार स्विकारल्याचा रुजू अहवाल तसेच ई-प्रोफाईलमध्ये नोंद केल्याबाबत संबंधीत विभाग प्रमुखामार्फत तात्काळ शासनास अहवाल सादर करावा.

८. सदर उमेदवारांनी नियुक्तीच्या दिनांकापासून सहा महिन्याच्या आत स्वग्राम घोषित करणे आवश्यक आहे. तद्नंतर त्यांनी स्वग्राम घोषित केल्यास त्यात फेरबदल करता येणार नाही.

९. विशिष्ट ठिकाणी पदस्थापना/बदली/नियुक्ती मिळण्यासाठी लोकप्रतिनिधी मार्फत दडपण/ दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास संबंधित उमेदवारांविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ मधील तरतुदीनुसार शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल.

१०. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१४११२६१६२०५९३९१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Maroti Keshavrao Kendre

Digitally signed by Maroti Keshavrao Kendre
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Maroti Keshavrao Kendre
Date: 2014.11.27 12:37:14 +05'30'

**(मा.के.केन्द्रे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**
संबंधित उमेदवार

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपुर,
२) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपुर,
३) मा.मंत्री (नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
५) सर्व विभागीय आयुक्त, पुणे/नागपूर
६) जिल्हाधिकारी, नागपूर/पुणे/अमरावती/मुंबई/पालघर
७) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
८) सर्व सह संचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय
९) उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१०) सर्व जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१२) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/पुणे/अमरावती/पालघर
१४) सर्व सह सचिव/उप सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) सामान्य प्रशासन विभाग (का.१२/का.८/का.१६-ब), मंत्रालय, मुंबई,
१६) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,
१७) निवड नस्ती, कार्यासन-१४२७, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.